**प्रधानमंत्री फसल विमा योजनेंतर्गत पूरक अनुदान" या योजनेअंतर्गत रु.२९,०२५/ इतकी रक्कम विमा कंपनीस वितरीत करण्यासाठी मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रपिवियो-२०२२/प्र.क्र.८०/११ अे,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: २३ फेब्रुवारी, २०२३

**वाचा-**

१. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. प्रपिवियो-२०१९/प्र.क्र.१२/११-अे, दि. ३१.५.२०१९
२. कृषि व पदुम विभाग, शासन परिपत्रक क्र. प्रपिवियो-२०१९/प्र.क्र.१२/११-अे, दि. ११.०९.२०१९
३. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क.४३/अर्थ-३, दि.०४/०४/२०२२
४. संचालक (वि. व प्र.) कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र जा.क्र.कृआ/मुसां./अ.मा. पुहआफपिवियो/२०२३/ ३७०३, दि.०१.०२.२०२३.

**प्रस्तावना :-**

प्रधानमंत्री फसल विमा योजनेच्या मार्गदर्शक सूचनेनुसार पात्र शेतकऱ्यांना नुकसान भरपाई निश्चित करण्याची कार्यवाही करण्यात येत असून काही प्रकरणी फळपिक विमा नुकसान भरपाई अत्यंत कमी प्रमाणात परिगणीत होत आहे. अशा प्रकरणांमध्ये लाभार्थी शेतकऱ्यांना विम्याच्या परताव्यापोटी नुकसान भरपाई रक्कम रु.१०००/- पेक्षा कमी येत असल्याने किमान रक्कम रु.१०००/ अदा करण्यासंदर्भात संदर्भ क्र. (१) अन्वये निर्णय घेण्यात आला असून संदर्भ क्र. (२) च्या परिपत्रकान्वये सदर योजनेसंदर्भातील अवलंबवयाची कार्यपध्दती आणि अटी व शर्ती विहीत करण्यात आल्या आहेत. कृषि आयुक्तालयाच्या संदर्भ क्र. (४) च्या पत्रान्वये मागणी केल्यानुसार पुनर्रचित हवामान आधारीत फळपिक विमा योजनेअंतर्गत आंबिया बहार २०२१-२२ करीता एकूण रु. २९,०२५/- इतकी रक्कम "प्रधानमंत्री फसल विमा योजनेंतर्गत पुरक अनुदान" या योजनेसाठी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"प्रधानमंत्री फसल विमा योजनेंतर्गत पुरक अनुदान" या योजनेअंतर्गत कृषि आयुक्तालयाने प्रस्तावित केल्यानुसार पुनर्रचित हवामान आधारीत फळपिक विमा योजनेसाठी आंबिया बहार २०२१-२२ करीता एकूण रु. २९,०२५/- इतकी रक्कम खालील तक्त्यात स्तंभ क्र.६ मध्ये नमूद केल्याप्रमाणे वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**आंबिया बहार सन २०२१-२२**

(रक्कम रु.)

| अ.क्र. | विमा कंपनीचे नाव | नुकसान भरपाईस पात्र शेतकरी संख्या | एकूण नुकसान भरपाई देय रक्कम | विमा कंपनी देय रक्कम | राज्य शासन देय तफावत रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | एच.डी.एफ.सी. अर्गो जनरल इन्शुरन्स कं. प्रा. लि. | १५ | १५,००० | ७,६७५ | ७,३२५ |
| २ | रिलायन्स जनरल इन्शुरन्स कं. प्रा. लि. | ६० | ६०,००० | ३८,३०० | २१,७०० |
| **एकूण** | | **७५** | **७५,०००** | **४५,९७५** | **२९,०२५** |

२. प्रस्तुत बाबींवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा :-

**मागणी क्र. डी -३**
**२४०१ - पीक संवर्धन**
**११०, पीक विमा (००) (१०) प्रधानमंत्री फसल विमा योजनेंतर्गत पुरक अनुदान**
**(२४०१ B०५२) (अनिवार्य)**
**३३, अर्थसहाय्य**

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी प्रधानमंत्री फसल विमा योजनेंतर्गत पुरक अनुदान योजनेच्या शासन निर्णय व योजनेसंदर्भातील अवलंबवावयाची कार्यपध्दती आणि अटी व शर्ती नुसारच खर्च करण्याची जबाबदारी आयुक्त (कृषि) यांची राहील.

४. प्रस्तुत प्रयोजनार्थ आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी तर सहायक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. प्रस्तूत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०२२३११४५३७१३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH

Digitally signed by SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=5140223e17381bc47a67b9fede8dda33c03e3e9ce591f826d8193080c68a08b8, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E40A063B6B4E8F59F91F350AA6FEC292A55DB5BF8829C64D6C44E00A701CDAAC, cn=SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH
Date: 2023.02.23 11:49:10 +05'30'

**( सरिता बांदेकर- देशमुख )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
३. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

४. संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
७. सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
१०. वित्त विभाग (व्यय-१/ अर्थ-१३), मंत्रालय, मुंबई- ३२
११. सह सचिव (१०-अे ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१२. कक्ष अधिकारी (२- अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१३. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
१४. प्रधान सचिव (मा. राज्यपाल कार्यालय) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
१५. विभागीय व्यवस्थापक, एचडीएफसी इर्गो जनरल इन्शुरन्स कंपनी लि., १ माळा, एचडीएफसी हाऊस, १६५-६६/ बॅक बे, चर्चगेट, मुंबई-२०.
१६. रिलायन्स जनरल इन्शुरन्स कंपनी लि., वेस्टर्न एक्सप्रेस हायवे, ५ वा मजला, चिंतामणी अव्हेन्यू, विरानी औद्योगिक वसाहत जवळ, गोरेगाव (इ), मुंबई - ४०००६३.
१७. निवड नस्ती (कार्यासन ११-अे).